**औद्योगिक प्रशिक्षण संस्था (आय.टी.आय.) मधील व्यवसाय विषय घेऊन उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना इ. १० वी व इ. १२ वी ची समकक्षता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः औप्रशि-२०१८/प्र.क्र.११०/एस.डी.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २७ सप्टेंबर, २०१८

<u>संदर्भ :</u>-शासन निर्णय शालेय शिक्षण विभाग क्र.औप्रशि-२०१८/प्र.क्र.११०/एस.डी.२, दि.३० मे, २०१८.

<u>प्रस्तावना:-</u>

इ. १० वी उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांनी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतून १ अथवा २ वर्षाचे व्यवसाय अभ्यासक्रम पूर्ण केल्यास, अशा विद्यार्थ्यांना राज्य मंडळातर्फे घेण्यात येणाऱ्या इ. १२ वी ची समकक्षता देण्याबाबत तसेच इ. १० वी उत्तीर्ण न झालेल्या विद्यार्थ्यांनी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून व्यवसाय अभ्यासक्रम पूर्ण केल्यास अशा विद्यार्थ्यांना राज्य मंडळातर्फे घेण्यात येणाऱ्या इ. १० वी ची समकक्षता देण्याबाबतचा प्रस्ताव कौशल्य विकास व उद्योजकता विभागातर्फे शालेय शिक्षण विभागास सादर करण्यात आला होता.

शासनाने संदर्भाधीन शासन निर्णयान्वये याबाबत धोरण निश्चित केले होते. तथापि यासंदर्भात प्राप्त सूचना विचारात घेऊन महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाचे अधिकारी व व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाचे अधिकारी यांनी यामध्ये सुधारणा करण्याचे प्रस्तावित केले होते. यानुषंगाने सदरहू धोरणामध्ये सुधारणा करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

<u>शासन निर्णय :-</u>

(१) औद्योगिक प्रशिक्षण संस्था (आय.टी.आय.) मधील व्यवसाय विषय घेऊन उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना इ. १० वी व इ. १२ वी ची समकक्षता देणेबाबतचा संदर्भाधीन दि.३०,मे २०१८ चा शासन निर्णय या आदेशान्वये अधिक्रमित करण्यात येत असून सुधारित धोरण पुढीलप्रमाणे राहील.

(२) राज्यातील सर्व शासकीय तसेच शासन मान्यता प्राप्त / संलग्नता प्राप्त खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांनी राज्य मंडळाकडून माध्यमिक शाळांप्रमाणे मंडळ मान्यता व मंडळ सांकेतांक घेणे आवश्यक राहील. तसेच औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील ज्या विद्यार्थ्यांना राज्य मंडळातर्फे घेण्यात येणाऱ्या इ.१० वी अथवा इ.१२ वी प्रमाणपत्र परीक्षा/ट्रान्सफर ऑफ क्रेडिट्सह समकक्षतेसाठी संबंधित औद्योगिक प्रशिक्षण संस्था/केंद्रामार्फत अर्ज करता येईल.

(३) औद्योगिक प्रशिक्षण संस्था (आय.टी.आय.) मधील व्यवसाय विषय घेऊन उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना इ. १० वी व इ. १२ वी ची समकक्षता देणेबाबत सुधारित धोरण खालीलप्रमाणे आहे.

३.१ राज्य मंडळाच्या इ.१० वी आणि इ.१२ वी च्या परिक्षेमध्ये कोणत्याही दोन भाषा उत्तीर्ण करणे या विद्यार्थ्यांना अनिवार्य राहील.

३.२ राज्य मंडळाच्या इ.१० वी परीक्षेसाठी निर्धारित श्रेणी विषयांमध्ये (उदा. व्यक्तिमत्व विकास इ.) आणि इ.१२ वी परीक्षेकरिता निश्चित करण्यात आलेल्या पर्यावरण शिक्षण व श्रेणी विषयांमध्ये (उदा. शारीरिक व आरोग्य शिक्षण इ.) उत्तीर्ण होणे या विद्यार्थ्यांना अनिवार्य असेल.

३.३ औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील व्यवसाय विषय घेऊन उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना त्यांनी राज्य मंडळाच्या विषय योजनेतील २ भाषा व श्रेणी विषय उत्तीर्ण असल्यामुळे या विषयांतून सूट देऊन समकक्षतेकरिता उत्तीर्ण विषय ग्राह्य धरण्यात येतील.

३.४ माध्यमिक शालांत प्रमाणपत्र (इ.१० वी) व उच्च माध्यमिक प्रमाणपत्र (इ.१२ वी) परीक्षेमध्ये कोणत्याही दोन भाषेत उत्तीर्ण होणे आवश्यक असेल व ज्या भाषेत विद्यार्थी उत्तीर्ण होईल त्या भाषेपैकी उच्च माध्यमिक स्तरावर उपलब्ध माध्यमातून त्यांना शिक्षण घेता येईल.

३.५ माध्यमिक शालांत प्रमाणपत्र (इ.१० वी) च्या समकक्षतेसाठी राज्य मंडळाच्या पुढील विषयांसाठीच ट्रान्सफर ऑफ क्रेडिटसचा लाभ देय आहे.

(१) कोणताही एक भाषा विषय (२) गणित (३) विज्ञान व तंत्रज्ञान (४) सामाजिक शास्त्रे.

३.६ उच्च माध्यमिक प्रमाणपत्र (इ.१२ वी) समकक्षतेसाठी कोणत्याही दोन भाषा, पर्यावरण शिक्षण व श्रेणी विषय या विषयांव्यतिरिक्त अन्य चार वैकल्पिक विषयांसाठीच ट्रान्सफर ऑफ क्रेडिट्सचा लाभ देय आहे.

**(४)** औद्योगिक प्रशिक्षण संस्था (आय.टी.आय) मधील व्यवसाय विषय घेऊन उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना इ.१० वी व इ.१२ वी परीक्षेशी समकक्ष मानून मंडळाच्या गुणपत्रिका व प्रमाणपत्र देण्यासंदर्भात खाली नमूद केल्याप्रमाणे कार्यपध्दती राहील.

४.१ जे विद्यार्थी इ. १० वी च्या परिक्षेत उत्तीर्ण झाले नाहीत व औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये ज्या अभ्यासक्रमांची अर्हता इ. १० वी अनुत्तीर्ण अशी आहे, असा १ अथवा २ वर्षाचा अभ्यासक्रम यशस्वीपणे पूर्ण करतील अशा विद्यार्थ्यांना राज्य मंडळातर्फे घेण्यात येणाऱ्या इ.१० वी च्या प्रमाणपत्राच्या समकक्षतेकरिता ट्रान्सफर ऑफ क्रेडिट्स देण्यात येतील.

४.२ जे विद्यार्थी इ. १० वी उत्तीर्ण झाल्यानंतर औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये ज्या अभ्यासक्रमांची प्रवेश अर्हता इ. १० वी उत्तीर्ण अशी आहे, असा २ वर्षाचा अभियांत्रिकी व्यवसाय अभ्यासक्रम औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधून उत्तीर्ण करतील त्यांना राज्य मंडळातर्फे घेण्यात येणाऱ्या इ. १२ वी च्या प्रमाणपत्राच्या समकक्षतेकरिता चार विषयांचे ट्रान्सफर ऑफ क्रेडिटस् देण्यात येतील.

४.३ ज्या अभ्यासक्रमांची प्रवेश अर्हता इ. १० वी उत्तीर्ण अशी आहे, असा एक वर्षाचा अभियांत्रिकी व्यवसाय अभ्यासक्रम औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधून उत्तीर्ण केल्यानंतर, त्या व्यवसायाशी संबंधित शिकाऊ उमेदवारी (ट्रेड ॲप्रेंटिसशिप) पूर्ण करुन शिकाऊ उमेदवारी परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य राहिल, तद्नंतरच त्यांना राज्य मंडळातर्फे घेण्यात येणाऱ्या इ. १२ वी च्या प्रमाणपत्राच्या समकक्षतेकरिता चार विषयांचे ट्रान्सफर ऑफ क्रेडिट्स देण्यात येतील.

४.४ बिगर अभियांत्रिकी व्यवसाय अभ्यासक्रम पूर्ण करणाऱ्या विद्यार्थ्यांना फक्त दोनच विषयांचे ट्रान्सफर ऑफ क्रेडिट्स देण्यात येतील. तसेच एक वर्षाचा अभियांत्रिकी व्यवसाय अभ्यासक्रम उत्तीर्ण असणाऱ्या तथापि शिकाऊ उमेदवारी (ट्रेड ॲप्रेंटिसशिप) परीक्षा उत्तीर्ण नसणाऱ्या विद्यार्थ्यांना फक्त २ व्यवसाय विषयांचे क्रेडिटस् देण्यात येतील.

४.५ तथापि, ज्या विद्यार्थ्यांनी एक वर्षाचा व्यवसाय अभ्यासक्रम उत्तीर्ण झाल्यानंतर, शिकाऊ उमेदवारी पूर्ण केलेली नसेल अशा विद्यार्थ्यांना ट्रान्सफर ऑफ क्रेडिट्सच्या आधारे तो विद्यार्थ्यी इ.१२ वी समकक्षतेकरिता पात्र होत असल्यास त्याला अशी समकक्षता म्हणजे गुणपत्रक व प्रमाणपत्र इ. १० वी उत्तीर्ण नंतर किमान दोन वर्षांनंतर प्राप्त करता येतील.

**(५)** (अ) औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील १ अथवा २ वर्षांचा व्यवसाय अभ्यासक्रम उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांच्या एकूण गुणांचे रुपांतर राज्य मंडळातर्फे घेण्यात येणाऱ्या परीक्षेकरिता ४०० गुणांमध्ये करण्यात येईल.

(ब) एक वर्षाचा व्यवसाय अभ्यासक्रम उत्तीर्ण असणाऱ्या तथापि, शिकाऊ उमेदवार परीक्षा उत्तीर्ण नसणाऱ्या विद्यार्थ्यांच्या एकूण गुणांचे रुपांतर २०० गुणांमध्ये करण्यात येईल.

(क) उपरोक्त “अ” व -ब॰ करिता ४ अथवा २ विषयांची / विषय गटांची नांवे निश्चित करुन राज्य मंडळास कळविण्याची जबाबदारी व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाची राहील.

**(६)** विद्यार्थ्यांला इ. १० वी/ इ. १२ वी उत्तीर्ण होण्याकरिता सर्व ४ किंवा २ व्यवसाय विषयांचे क्रेडिटस्/ गुण घेणे अनिवार्य राहील.

**(७)** श्रेणी विषयांकरिता मंडळाने निर्धारित केलेली जवळची शाळा / कनिष्ठ महाविद्यालय निवडण्याची मुभा या विद्यार्थ्यांना राहिल.

(८) ट्रान्सफर ऑफ क्रेडिट्स मिळविण्यासाठी अर्ज करताना सदर अर्जासोबत माध्यमिक शालांत प्रमाणपत्र (इ.१० वी) परीक्षेच्या (अंतिम) गुणपत्रिकेची प्रत व औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील व्यवसाय अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या प्रमाणपत्राची प्रत जोडणे / अपलोड करणे आवश्यक राहिल. तसेच, उच्च माध्यमिक प्रमाणपत्र इ. १२ वी साठी ट्रान्सफर ऑफ क्रेडिटस् मिळविण्यासाठी इ. १० वी व इ. १२ वी च्या गुणपत्रिकांची प्रत व औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील व्यवसाय अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या प्रमाणपत्राची प्रत जोडणे / अपलोड करणे आवश्यक राहिल.

(९) विद्यार्थ्यांच्या एक किंवा दोन वर्षाच्या औद्योगिक प्रशिक्षण संस्था व्यवसाय अभ्यासक्रमाच्या अंतिम परिक्षेतील विद्यार्थ्यास प्राप्त गुणांचे रुपांतर २ किंवा ४ क्रेडिटस् प्रमाणे करून राज्य मंडळाकडे देण्याची जबाबदारी व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाची राहील.

(१०) औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून एक वर्षाचा व्यवसाय अभ्यासक्रम अथवा दोन वर्षाचा व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यापूर्वी विद्यार्थी दोन भाषा, पर्यावरण शिक्षण व श्रेणी विषयात उत्तीर्ण झाला असल्यास त्याला सदर विषयास पुन्हा प्रविष्ट होण्याची आवश्यकता असणार नाही. मात्र सदर सर्व विषयात किंवा त्यातील काही विषयात विद्यार्थी उत्तीर्ण झाला नसल्यास औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचा उपरोक्त अभ्यासक्रम सुरु असताना त्याला सदर विषय उत्तीर्ण होण्यासाठी नियमित विद्यार्थी म्हणून संधी देण्यात येईल. मात्र उपरोक्त अभ्यासक्रम पूर्ण झाल्यानंतर सदर विषयास प्रविष्ट व्हावे लागल्यास असे विद्यार्थी पुनर्परिक्षार्थी (Repeater) म्हणून गणले जातील.

(११) औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधून दोन वर्षांचा व्यवसाय अभ्यासक्रम अथवा एक वर्षाचा व्यवसाय अभ्यासक्रम सुरु असताना दोन भाषा, पर्यावरण शिक्षण इ. विषयात विद्यार्थी उत्तीर्ण झाल्यास त्याला मंडळामार्फत देय असलेले सवलतीचे गुण अनुज्ञेय राहतील.

(१२) इ. १० वी व इ. १२ वी च्या विद्यार्थ्यांना मंडळाची श्रेणी सुधार योजना लागू राहणार नाही.

(१३) औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये शिकविल्या जाणाऱ्या व्यवसाय विषयांची / विषय गटांची यादी व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने मंडळाकडे सादर करावी. औद्योगिक प्रशिक्षण संस्था / केंद्रांना मंडळ मान्यता व सांकेतिक क्रमांक देताना संस्था / केंद्रनिहाय व्यवसाय विषय / विषय गटांनाही मंडळाने विषय मान्यता दयावी. मंडळाच्या पुढील प्रक्रियेसाठी इ. १० वी / इ. १२ वी च्या सदर विषय / विषय गटांना मंडळाने विषय सांकेतांक (Subject Code) निश्चित करावेत.

(१४) उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे पात्र विद्यार्थ्यांना राज्य मंडळातर्फे गुणपत्रिका व प्रमाणपत्र देण्यात येईल. इ. १० वी च्या गुणपत्रिका व प्रमाणपत्रावर माध्यमिक शालान्त प्रमाणपत्र परिक्षा (तंत्रशास्त्र

विज्ञान / Technology Science) व इ. १२ वी च्या गुणपत्रिका व प्रमाणपत्रावर शाखेच्या (Stream) रकान्यामध्ये (तंत्रशास्त्र विज्ञान / Technology Science ) असे नमूद करण्यात यावे.

**(१५)** ट्रान्सफर ऑफ क्रेडिट्स घेऊन विद्यार्थी इ. १० वी व इ. १२ वी परिक्षा उत्तीर्ण झाल्यास पुन्हा मंडळाच्या सदर परिक्षेला नियमित अथवा पुनर्परिक्षार्थी म्हणून प्रविष्ठ होऊ शकणार नाही.

**(१६)** यानुषंगाने राज्य मंडळाने शुल्क व अन्य आवश्यक प्रशासकीय सूचना निर्गमित कराव्यात. तसेच कौशल्य विकास व उद्योजकता विभागातर्फे देखील या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करावी.

**(१७)** इ. १० वी ची समकक्षता मिळालेला औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील विद्यार्थी इ. ११ वी साठी कोणत्याही शाखेत प्रवेश घेऊ शकेल. तसेच, इ. १२ वीची समकक्षता मिळालेला औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील विद्यार्थी सर्व शाखांमध्ये पदवीच्या अथवा इ. १२ वी उत्तीर्ण अर्हतेच्या पदविकेच्या प्रथम वर्षाला प्रवेशासाठी पात्र राहिल.

**(१८)** सदर शासन निर्णय सन २०१८-१९ या वर्षामध्ये औद्योगिक प्रशिक्षण संस्था / केंद्रामध्ये एक किंवा दोन वर्षाच्या अभ्यासक्रमासाठी नियमित विद्यार्थी म्हणून प्रत्यक्ष प्रशिक्षण घेत असलेल्या व त्यापुढे प्रवेशित होणाऱ्या विद्यार्थ्यांना लागू राहिल. तथापि, सदर विद्यार्थी संबंधित संस्थांना मंडळ मान्यता व सांकेतांक मिळाल्यानंतर अर्ज करु शकतील. तत्पूर्वीच्या विद्यार्थ्यांना सदर तरतूदी लागू होणार नाहीत.

**(१९)** सदर शासन निर्णय कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**(२०)** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२६१५४२१८५८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna Siddharth Kharat

Digitally signed by Suvarna Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=065279b98828b1456ad0d62a97fa45eee948af8abe5a27104d4e132c5bd1d93a, cn=Suvarna Siddharth Kharat
Date: 2018.09.27 18:03:42 +05'30'

**( डॉ.सुवर्णा खरात )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई
२. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई
३. सर्व विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानसभा

४. सर्व विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानपरिषद
५. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
६. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. मा. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
९. मा.सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
११. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान, मुंबई
१४. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे
१५. शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. संचालक, विद्याप्राधिकरण, पुणे
१७. सर्व विभागीय अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ
१८. सर्व विभागीय सचिव, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ
१९. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
२०. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक), जिल्हा परिषद, सर्व
२१. शिक्षण निरिक्षक, मुंबई (पश्चिम, दक्षिण, उत्तर)
२२. प्रशासन अधिकारी, महानगरपालिका सर्व
२३. निवड नस्ती, एस.डी.२.